GR - 20040812124322001 - 1700

१ जानेवारी, १९९५ पर्यंत अस्तित्वात असलेल्या झोपडपट्टीतील झोपडीधारकांना ओळखपत्र (फोटोपास) देण्याबाबत शासनाचे सुधारित धोरण.

## महाराष्ट्र शासन

### गृहनिर्माण विभाग

### शासन शुध्दीपत्र क्रमांक:गवसु-१२२०/प्र.क्र.२०४(१)/झोपसु-१
### दिनांक:- १० ऑक्टोबर, २००२

वाचा: १) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.गवसु-१२२०/प्र.क्र.२०४(१)/झोपसु-१, दि.११जुलै, २००१

२) गृहनिर्माणविभाग,शासनशुध्दीपत्रक .क्र.गवसु.१२२०/प्र.क्र.३६४/झोपसू.१, दि.१८ ,सप्टेंबर,२००२.

**प्रस्तावना**

संदर्भाधीन शासन निर्णयानुसार झोपडपट्टीवासियांचे सर्वेक्षण करून पात्र झोपडीधारकांना ओळखपत्र देण्याच्या अनुषंगाने धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. संदर्भात नमुद केलेल्या अनुक्रमांक-१ व २ नुसार पात्र झोपडपट्टीवासियांकरिता ओळखपत्र योजना या योजनेची व्याप्ती, योजने अंतर्गत लाभासाठी पात्र होण्याकरिता झोपडपट्टीवासियांनी पूर्ण करावयाच्या अटी, ओळखपत्राच्या अटी, एकत्रित शुल्क याबाबत निर्णय घेण्यात आलेले आहेत. या योजनेची व्याप्ती झोपड्यांच्या समुहात २५ पेक्षा अधिक झोपड्या असल्यास अशाच झोपड्यांच्या बाबतीत हे धोरण लागू करण्यात आले आहे. त्यामुळे संख्येने कमी असलेल्या किंवा विखुरलेल्या स्वरूपात असलेल्या झोपड्या किंवा झोपडीधारक कितीही कालावधी पूर्वीचे असले तरीही त्यांना या योजनेचा लाभ मिळत नाही आणि ते निष्कासनास पात्र ठरतात. दिनांक १.१.९५ पूर्वीच्या असुनही त्यांची संख्या २५ पेक्षा कमी आहे या एकाच कारणास्तव तेथील झोपडीधारक झोपडपट्टीविषयक धोरणाचा फायदा मिळण्यापासून वंचित राहतात. शासनाने आता या बाबीचा सर्वंकष विचार करून पात्र झोपडपट्टीवासियांकरिता ओळखपत्र योजना २००१ या योजनेचा लाभ झोपड्यांची संख्या विचारात न घेता याबाबतच्या धोरणांतर्गत विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती पूर्ण करीत असल्यास त्यांना संरक्षण देण्याचा आणि शासनाच्या सुधारीत धोरणाचा त्यांना लाभ देण्यासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

शासन शुध्दीपत्रक

संदर्भात नमुद केलेल्या अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयाचा परिच्छेद २ (भाग-४) येथील "२५ किंवा त्यापेक्षाही कमी झोपड्या एकत्रितरित्या किंवा विखुरलेल्या अवस्थेत असल्यास त्यांना ही योजना लागू होणार नाही."

या मजकुरा नंतर पुढील मजकूर टाकण्यात येत आहे.

"झोपडपट्टयांमधील झोपड्यांची संख्या विचारात न घेता २५ किंवा संख्येने त्यापेक्षा कमी असलेल्या एकत्रितरित्या किंवा विखुरलेल्या अवस्थेत असलेल्या झोपडपट्टीधारकांना ओळखपत्र देण्यात येणार नाही. तथापि, या योजनेनुसार सदर झोपडीधारक संरक्षणास पात्र ठरतील. त्याचप्रमाणे अशा झोपडपट्टीवासियांचे निष्कासन करणे आवश्यक असेल तर त्यांना शासनाने अथवा संबंधित संस्थेने पर्यायी जागा देवून पुनर्वसन केल्यानंतर त्यांचे निष्कासन करता येईल. पर्यायी जागा स्विकारणे झोपडीधारकांना बंधनकारक राहिल."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सी.के.जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव.
५. मा. राज्यमंत्री (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिवांचे खाजगी सचिव.
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता)लेखापरीक्षा
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता)लेखापरीक्षा
९. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व)मुंबई
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, ५ वा मजला, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई
१४. सर्व विभागीय महसुल आयुक्त.
१५. सर्व महानगरपालिका आयुक्त/प्रशासक (१८ महानगरपालिका)
१६. सर्व जिल्ह्यांचे जिल्हाधिकारी